**जळगांव महानगरपालिका यांनी हुडकोकडून घेतलेल्या कर्जाच्या परतफेडीसाठी अनुदान मंजूर करणेबाबत.......**

**महाराष्ट्र शासन,**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.जमपा २१०३/१६२२/सीआर-१८६/०३/नवि-२६**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक :- ३१ मार्च, २००५**

**पहा:-** शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्र.जमपा-२६०३/१६४२/ प्र.क्र.१८६/०३/नवि-२६, दिनांक ३१ मार्च, २००४.

**<u>शासन निर्णय</u>** :-

तत्कालीन जळगांव नगरपरिषदेने त्यांच्या घरकुल योजनांसाठी व वाघुर पाणी पुरवठा योजनेसाठी मंत्रिमंडळाने रु.२३.३६ कोटी एवढी रक्कम कर्जाऊ देण्याचा निर्णय घेतला त्यापैकी कर्जाच्या थकित हप्त्यापोटी ४,००,३३,०००/- इतकी रक्कम शासनाने अदा करावयाची आहे. सदर कर्जाच्या थकबाकीची परतफेड केल्यानंतरच हुडको राज्यातील इतर नगरपरिषदा व महानगरपालिका यांना कर्ज उपलब्ध करुन देणार आहे. ही बाब विचारात घेऊन शासनाने जळगांव महानगरपालिकेने घेतलेले कर्जाची परतफेड करण्यासाठी शासनाकडून जळगांव महानगरपालिकेला कर्ज म्हणून रक्कम उपलब्ध करुन देण्याचा निर्णय घेतलेला आहे.

यासाठी रुपये ४,००,३३,०००/- (रुपये चार कोटी तेहतीस हजार फक्त) इतक्या रक्कमेची आकस्मिकता निधी अग्रिमाद्वारे ही रक्कम कर्जाची थकबाकी म्हणून हुडकोला (Hudco) अदा करण्यास शासन या निर्णयान्वये मान्यता देत आहे. त्याकरिता श्री. श्री.वि. जाधव, अवर सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांना "आहरण व संवितरण" अधिकारी व श्री. फ.ब. खान, उप सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित कारण्यात येत असून, त्यांनी रुपये ४,००,३३,०००/- इतका निधी अधिदान व लेखा अधिकारी मुंबई यांचेकडून हुडकोच्या (Hudco) नांवे काढावा. सदर खर्च हा मागणी क्र. "एफ-२, मुख्य लेखाशीर्ष २२१७, नगर विकास, १९१. स्थानिक स्वराज्य संस्था, महानगरपालिका, नगर विकास प्राधिकरणे, नगर सुधार मंडळे, इत्यादींना सहाय्य, ४१, सहाय्यक अनुदाने (००) (२२) अखिल भारतीय स्थानिक स्वराज्य संस्थेला सहाय्यक अनुदान (२२१७१०२५) या लेखाशीर्षाखाली टाकण्यात येऊन वित्त विभागाच्या ज्ञापन क्र.आकनि-११०५/१६६/अर्थसंकल्प-१५, दिनांक ३१/३/२००५ (संकेतांक क्रमांक -८०००-१६६-५) अन्वये मंजूर करण्यात आलेल्या आकस्मिकता निधीतील खर्चातून भागविण्यात यावा. विधी मंडळाच्या पावसाळी अधिवेशनात पूरक मागणीद्वारे आकस्मिकता निधीतील

अग्रिमाची भरपाई करण्यात यावी. तसेच यापुढे जळगांव महानगरपालिकेस शासनाकडून दिल्या जाणाऱ्या अनुदानातून सदर रक्कम समायोजित करावयाची आहे.

सदरील आकस्मिकता अग्रिमातून करावयाची देयके कोषागार अधिकारी यांना सादर करताना देयकावर लाल शाईने "आकस्मिकता निधी अग्रिम शासन ज्ञापन वित्त विभाग क्रमांक आकनि-११०५/१६६/अर्थसंकल्प-१५, दिनांक ३१/३/२००५ अन्वये मंजूर" असे लिहावे. तसेच शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.सीएनएफ-१०८६/१५३/अर्थसंकल्प-३, दिनांक २८ ऑगस्ट, १९८६ अन्वये केलेल्या सूचनांचे अनुपालन काटेकोरपणे करावे.

सदरचा निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १८१/व्यय-३, दिनांक ३१/३/२००५ व क्र.९८८/अर्थोपाय, दिनांक ३१ मार्च, २००५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( म.दि. आडिवरेकर )**
**महाराष्ट्र शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

महालेखाकार-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
आयुक्त, जळगांव महानगरपालिका, जळगांव
जिल्हाधिकारी, जळगांव
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई-३२ (२ प्रतीत)
कक्ष अधिकारी, व्यय-३/ अर्थसंकल्प-३/अर्थसंकल्प -१५, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
निवडनस्ती (नवि २६), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.